मा.न्यायालयाच्या आदेशानुसार काष्टमंडूप डेव्हलपर्स प्रा.लि. यांना मुद्रांक शुल्क परतावा रकमेवरील व्याजाची रक्कम स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेतून अदा करण्यास व या लेख्यातून माहे जुलै २०२४ मध्ये रु.१० कोटी मधून खर्च करण्यास एक विशेष बाब म्हणून मंजूरी देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: याचिका- २०२३/प्र.क्र.४२६/म-१ (धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ०३ जुलै, २०२४

वाचा :
१) शासन ज्ञापन क्रमांक : आस्थापना -२००१/प्र.क्र.४१०/म-१, दि.३१.१०.२००१
२) शासन निर्णय क्रमांक: नोंदणी (संगणक)-२०१५/१५१७/प्र.क्र.४५२/म-१, दि.०८ ऑक्टोबर, २०१५.
३) शासन शुद्धिपत्रक क्रमांक: मुद्रांक-२०१७/३२६६/प्र.क्र.५०४/म-१, दि. १९ जून, २०१८
४) शासन शुध्दीपत्रक क्रमांक: मुद्रांक २०१७/३२६६/प्र.क्र.५०४/म-१(धोरण), दि.११.१.२०२१
५) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे आदेश क्र.का.१२/मु.प./प्र.क्र.६१-१२/५०७, दिनांक ०२.०५.२०२४ तसेच आदेश क्र.का.१२/मु.प./प्र.क्र.६१-१२/५३७/२०२४, दिनांक १०/५/२०२४.
६) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.का.१२/मु.प.प्र.क्र.६१-१२/५१४/२०२४, दिनांक ०७.०५.२०२४ तसेच पत्र क्र.का.१२/मु.प.प्र.क्र.६१-१२/५३९/२०२४, दिनांक १०/५/२०२४.
७) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे रिट याचिका क्र. ७९६८/२०१७, दि.५/६/२०२३ व अवमान याचिका क्र. ४९२/२०२३ दिनांक ३.५.२०२४ रोजीचे आदेश.
८) मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली, विशेष अनुमती याचिका क्र. ४५६९५/२०२३, दिनांक ३०/४/२०२४ मधील न्यायनिर्णय.
९) शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५.
१०) शासन निर्णय क्र. याचिका- २०२३/प्र.क्र.४२६/म-१(धोरण), दिनांक १४.६.२०२४.
११) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र जा.क्र.का.८/नोंमनि/लेखा/काष्टमांडूप/व्याज/पीएलए मान्यता/२२२/२०२४, दिनांक २४/६/२०२४.
१२) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र जा.क्र.का.८/नोंमनि/लेखा/काष्टमांडूप/व्याज/पीएलए मान्यता/७३७/२०२४, दिनांक ३/७/२०२४.

**प्रस्तावना:-**

मे.काष्टमंडूप डेव्हलपर्स प्रा. लि. विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.७९६८/२०१७ मध्ये दि.५/६/२०२३ रोजी व अवमान याचिका क्र. ४९२/२०२३ मध्ये दिनांक ३/५/२०२४ रोजी व मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी विशेष अनुमती याचिका क्र.४५६९५/२०२३ मध्ये दिनांक ३०/४/२०२४ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाच्या अनुषंगाने मुद्रांक शुल्क परतावा रक्कम रु.३,२३,७५,६१५ या रकमेवरील व्याज हे मुद्रांक परतावा अर्ज दिनांक १६.३.२०१२ पासून दिनांक ३०/४/२०२४ पर्यंत (१२ वर्षे १ महिने १५ दिवस) अखेर ६ % प्रतिवर्ष व्याज रु.२,३५,५३,२६०/- (अक्षरी रु. दोन कोटी पस्तीस लाख त्रेपण्ण हजार दोनशे साठ मात्र) अर्जदारास नोंदणी विभागाच्या कार्यालयीन खर्चाच्या तरतुदीमधून वित्त विभागाच्या सहमतीने अदा करण्यास संदर्भ क्र. १० येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती.

तथापि, नोंदणी व मुद्रांक विभागास कार्यालयीन खर्चाकारीता मंजूर तरतूद ही सन २०२४-२५ या संपूर्ण आर्थिक वर्षासाठी असून प्राप्त अनुदान हे तीन महिन्यांसाठी लेखानुदानाव्दारे उपलब्ध करुन दिलेले आहे व पुढील कालावधीचे अनुदान अर्थसंकल्प मंजूर झाल्यानंतर टप्या-टप्याने प्राप्त होणार आहे. त्यामुळे प्रस्तुत अवतान याचिकेप्रकरणी सदर रक्कम नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात (PLA) जमा होणाऱ्या रकमेमधून खर्च करण्यास मान्यता देण्याची नोंदणी महानिरीक्षक कार्यालय, पुणे यांनी संदर्भ क्र.१२ येथील पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

त्यानुषंगाने प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार उक्त व्याजाची रक्कम नोंदणी व मुद्रांक विभागाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) अदा करण्यास व या लेख्यात माहे जुलै, २०२४ या महिन्यामध्ये खर्च होणा-या रु.१० कोटी या रकमेतून सदर व्याजाची रक्कम खर्च करण्यास " एक विशेष बाब" म्हणून परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात (PLA) जमा होणाऱ्या रकमेमधून मा.उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार मे. कास्टमंडूप डेव्हलपर्स प्रा.लि.यांना मुद्रांक परतावा रकमेवरील व्याजाची रक्कम रु. २,३५,५३,२६०/- (अक्षरी रु. दोन कोटी पस्तीस लाख त्रेपण्ण हजार दोनशे साठ फक्त) अदा करण्यास व या लेख्यातून माहे जुलै २०२४ मध्ये खर्च होणाऱ्या रु.१० कोटी या रक्कमेतून उक्त नमूद रक्कम खर्च करण्यास एक विशेष बाब म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च हा ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७०३१८५८२०४६१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL MALHARI JADHAV

Digitally signed by SUNIL MALHARI JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=a21caf384aa15b3f0e12f6f625410d8384fc1918599ab1b89ed39b6b8df74cd2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD3ACD0AE1800C2E54A0083162CA707A773B2FEF3AE4C523B53B902E3CF10460, cn=SUNIL MALHARI JADHAV
Date: 2024.07.03 19:10:15 +05'30'

**( सुनिल जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई .
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१०. अपर मुद्रांक नियंत्रक,प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई.
११. महालेखापाल-१ व २ (मुंबई/नागपूर) महाराष्ट्र राज्य.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे

१३. मुद्रांक जिल्हाधिकारी,बोरीवली
१४. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, वांद्रे (पुर्व), मुंबई- ४०० ०५१.
१५. उप संचालक (लेखा), नोंदणी महानिरीक्षक कार्यालय, पुणे.
१६. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. निवडनस्ती, कार्यासन म-१(धोरण), महसूल व विभाग, मंत्रालय, मुंबई.